**डॉ.बाबासाहेब आंबेडकर, तांत्रिक प्रशिक्षण केंद्र (साकार), जांभूळ, ता.कल्याण, जि.ठाणे येथील बंद पडलेले प्रशिक्षण केंद्र पुन्हा सुरु करावयाच्या अनुषंगाने इमारतीची दुरूस्ती करणे, संरक्षण भिंत बांधणे, वीज व पाणी या सुविधा व संबधीत इतर कामे करण्यासाठीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: एमपीसी-२०१७/प्र.क्र.१७२/महामंडळे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:- १६ ऑक्टोबर, २०१८

**वाचा :-**

व्यवस्थापकीय संचालक,महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मर्या.,मुंबई. यांचे क्र.व्य.सं./प्रकल्प-१/१९८४/२०१६, दि.०२.१२.२०१६ व क्र.उपव्य./प्रकल्प-२ व ३/७२२/२०१७, दि.१० जुलै,२०१७.

**प्रस्तावना :-**

डॉ.बाबासाहेब आंबेडकर, तांत्रिक प्रशिक्षण केंद्र (साकार), जांभूळ, ता.कल्याण, जि.ठाणे येथील बंद पडलेले प्रशिक्षण केंद्र पुन्हा सुरु करावयाच्या अनुषंगाने इमारतीची दुरूस्ती करणे, संरक्षण भिंत बांधणे, वीज व पाणी या सुविधा व संबधीत इतर कामे करण्यासाठी रु.४,९९,८४,४००/- (रुपये चार कोटी नव्व्याणव लक्ष चौऱ्यांशी हजार चारशे फक्त) इतक्या खर्चाच्या ढोबळ अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मर्या.,मुंबई. यांनी डॉ.बाबासाहेब आंबेडकर, तांत्रिक प्रशिक्षण केंद्र (साकार), जांभूळ, ता.कल्याण, जि.ठाणे येथील बंद पडलेले प्रशिक्षण केंद्र पुन्हा सुरु करावयाच्या अनुषंगाने इमारतीची दुरूस्ती करणे, संरक्षण भिंत बांधणे, वीज व पाणी या सुविधा व संबधीत इतर कामे करण्यासाठी रु.४,९९,८४,४००/- (रुपये चार कोटी नव्व्याणव लक्ष चौऱ्यांशी हजार चारशे फक्त) इतक्या रकमेच्या सादर केलेल्या ढोबळ अंदाज पत्रकास पुढील अटीं व शर्तींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१. काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सूरू करावे.
२. ढोबळ स्वरुपात करण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक तयार करुनच काम हाती घ्यावे.
३. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
४. उपरोक्त बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करून घ्यावे.
५. सदर जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

६. प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यापूर्वी अंदाजपत्रकावर मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे साक्षांकन आवश्यक आहे.

२. सदर डॉ.बाबासाहेब आंबेडकर, तांत्रिक प्रशिक्षण केंद्र (साकार), जांभूळ, ता.कल्याण, जि.ठाणे येथील बंद पडलेले प्रशिक्षण केंद्र पुन्हा सुरु करावयाच्या अनुषंगाने इमारतीची दुरूस्ती करणे, संरक्षण भिंत बांधणे, वीज व पाणी या सुविधा व संबधीत इतर कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त करुन, विहित नियमानुसार अटी व शर्ती निश्चित करुन नियमानुसार कार्यवाही कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग ठाणे यांनी तात्काळ करावी.

३. सदर बांधकामासाठीचा निधी महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मर्या.,मुंबई यांच्याकडे उपलब्ध असलेल्या केंद्र शासनाच्या विशेष केंद्रीय सहाय्य योजनेच्या रकमेतून खर्च करण्यास परवानगी देण्यात आहे. मात्र केंद्र शासनाच्या विशेष केंद्रीय योजनेच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मर्या.,मुंबई यांनी दक्षता घ्यावी.

४. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८१०१६१५०३४११७२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2018.10.16 15:07:35 +05'30'

**(अ.कों.अहिरे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) व्यवस्थापकीय संचालक,महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मर्या.,मुंबई,
२) उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२,
३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई,
४) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे,
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,ठाणे,
६) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
७) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे,
८) निवडनस्ती-महामंडळे.